राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान
राज्य ग्रंथालय नियोजन समिती गठीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक - मराग्रं २०२२/प्र.क्र.१३०(१)/ग्रं.क.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.

दिनांक: १६ मार्च, २०२४

**वाचा:** शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग मराग्रं-२०२१/प्र.क्र.१५६/२०२१/साशि-५, दि.०२ डिसेंबर, २०२१

**प्रस्तावना:**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकत्ता, या संस्थेची स्थापना भारत सरकारच्या आर्थिक सहाय्याने १९७२ साली झाली. देशातील सार्वजनिक ग्रंथालय सेवेचा सार्वत्रिक विकास करणे, हे प्रतिष्ठानचे उद्दिष्ट आहे. राज्यांमध्ये व संघराज्यांमध्ये ग्रंथालय सेवा प्रभावीपणे राबवून ती वृद्धिंगत करण्यासाठी प्रतिष्ठान, राज्यांना ५०:५० या प्रमाणात अनुरुप अनुदान देते. प्रतिष्ठानच्या या योजना राबविण्यासाठी राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या "बुक्स फॉर द मिलेनीअर्स ॲट देअर डोअरस्टेप" या पुस्तकामधील मार्गदर्शक तत्त्वांनुसार शासन निर्णयान्वये राज्य ग्रंथालय नियोजन समिती गठीत करण्यात आलेली आहे. सदर समितीची पुनर्रचना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान अंतर्गत राज्य ग्रंथालय नियोजन समितीची खालीलप्रमाणे पुनर्रचना करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे :-

| | | |
|---|---|---|
| १. | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | अध्यक्ष |
| २. | महासंचालक/संचालक, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता किंवा त्यांचे प्रतिनिधी | सदस्य |
| ३. | राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान यांच्या अध्यक्षांचे प्रतिनिधी (नामनिर्देशित सदस्य) | सदस्य |
| ४. | राज्य ग्रंथालय संघाचे अध्यक्ष किंवा सचिव | सदस्य |
| ५. | सहसचिव /उपसचिव (ग्रं.क.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई | सदस्य |
| ६. | श्री. वामन नारायण देशपांडे,छ.संभाजीनगर, शासन नियुक्त (नामनिर्देशित) सदस्य | सदस्य |
| ७. | ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई | निमंत्रक तथा सदस्य सचिव |

२. सदर समितीतील शासनाकडून तसेच राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानचे अध्यक्ष यांनी नामनिर्देशनाने नियुक्त केलेल्या अशासकीय सदस्यांचा कार्यकाल तीन वर्ष इतका राहील. ग्रंथालय संचालकांनी प्रतिष्ठानाकडून राबविण्यात येणाऱ्या अर्थसहाय्याच्या समान निधी व इतर मदत योजनांसाठी मंजूर निधीचा प्रारुप आराखडा सादर करणे व त्यास अंतिम मान्यता घेण्यासाठीचा प्रस्ताव नियमानुसार तपासून समितीस सादर करणे बंधनकारक राहील.

३. समितीच्या अशासकीय सदस्यांचा प्रवास भत्ता व दैनिक भत्ता शासनाच्या नियमानुसार मंजूर करण्याबाबतची कार्यवाही, संचालक, ग्रंथालय संचालनालय यांचेकडून करण्यात येईल आणि याकरीता होणारा खर्च,

"मागणी क्र.डब्ल्यू-४.
२२०५ कला व संस्कृती,
१०५ सार्वजनिक ग्रंथालये
(०१) ग्रंथालय संचालनालय,
(०१) (०१) ग्रंथालय संचालनालय,
योजनेतर खर्च (२२०५ ०२५१),
११ प्रवास खर्च",
या लेखाशिर्षांतर्गत भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१६११५००४५३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANITA PRAMOD TUMMULWAR

Digitally signed by ANITA PRAMOD TUMMULWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=AGRICULTURE AND ADF DEPARTMENT,
2.5.4.20=4a2a38bd3219cb07837653760d3739e645909c87e1f590a4c48ac5be90c246e8,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=39B0AF455329387CB15636BD36438437C8ADACC592042C2DF9B77B499001996D,
cn=ANITA PRAMOD TUMMULWAR
Date: 2024.03.16 12:00:07 +05'30'

**(अनिता तुम्मुलवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई,
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री (गृह), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त), यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
५. मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सह/उपसचिव, (ग्रंथालय कक्ष) उच्च व तंत्र शिक्षण विभाग मंत्रालय, मुंबई
८. ग्रंथालय संचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. महालेखापाल-१/२ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
१२. समितीचे सर्व सदस्य (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
१३. महासंचालक / संचालक, राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता, (ग्रंथालय संचालनालयामार्फत)
१४. श्री. वामन नारायण देशपांडे, छ. संभाजीनगर
१४. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय (ग्रंथालय संचालनालयामार्फत)
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई (प्रसिद्धीसाठी)
१६. निवडनस्ती (ग्रंथालय कक्ष) उच्च व तंत्र शिक्षण विभाग मंत्रालय, मुंबई.